**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत नागरी प्रकल्पांतर्गत कार्यरत असलेल्या अस्थायी पदांना दि.१.१०.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र.मबाआ-२०११/ प्र.क्र.६९/ का-७
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०११.

वाचा :- १) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५ एप्रिल, २००३.
२) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००३/प्र.क्र.४३८/का-६, दि.१४ जानेवारी, २००४.
३) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६, दि. ३१ मार्च, २००६.
४) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि. १६ ऑक्टोबर, २००७.
५) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००८/प्र.क्र.२३०/का-६, दि. १६ जुलै, २००९.
६) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००९/प्र.क्र.१८२/का-७, दि. १८ जुलै, २००९.
७) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०१०/प्र.क्र.४२/का-७, दि. ३० जुलै, २०१०
८) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०११/प्र.क्र.६९/का-७, दि.८.४.२०११.
९) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे क्र. मबाविआ/आस्था/ एबाविसे/ नाप्र/का-१/ २०११/४१०३, दि.५.१०.२०११

**निर्णय** :- महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून सुधारित आकृतीबंध शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि.५.४.२००३ अन्वये मंजूर केलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेली पदे तसेच संदर्भाधीन महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६, दि.३१ मार्च, २००६ व महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि. १६ ऑक्टोबर, २००७ व शासन निर्णय क्र. एबावि-२००८/ प्र.क्र.२३०अ/का-६, दि.१६ जुलै २००९ अन्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत नव्याने निर्माण करण्यात आलेली अस्थायी पदे विचारात घेवून एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतील १०४

नागरी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग दि.१४.१.२००४ च्या प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधातील मंजूर पदांच्या मर्यादेत व मानधनावरील ३१०४० अस्थायी पदांना दि.१.३.२०११ ते दि.३०.०९.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन निर्णय दि. ८.४.२०११ अन्वये मान्यता देण्यात आली होती.

२. उक्त प्रकरणी आता एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत १०४ नागरी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना व मानधनी पदांना पुढे चालू ठेवण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग दि.१४.१.२००४ अन्वये प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या अनुषंगाने आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी दि.५.१०.२०११ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाचा सागोपांग विचार करुन शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.१४.१.२००४ अन्वये प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या आढाव्याच्या अधीन राहून उक्त आढाव्यातील मंजूर पदांच्या मर्यादेत १०४ नागरी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदांना तसेच १५५२० अंगणवाडयामधील १५५२० अंगणवाडी सेविका व १५५२० अंगणवाडी मदतनीस अशा एकूण ३१०४० मानधनी पदांना दि.१.१०.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर पदे ही सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत असे उप आयुक्त (प्रशासन) महिला व बाल विकास, पुणे यांनी प्रमाणित केले आहे. उक्त प्रमाणपत्राच्या अधीन राहून सदर पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४ ऑक्टोबर २००४ अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे. (संगणक सांकेतांक क्र. २०१११०२१११२०९०८००१)

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(शं.शा.पढाळ )
शासनाचे उप सचिव.

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पूणे,
महालेखापाल महाराष्ट्र राज्य १/२ ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई ,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग (का-व्यय-१४ / अर्थसंकल्प-१९ / वित्तीय सुधारणा -१), मंत्रालय, मुंबई.
महिला व बाल विकास विभाग (का-४) आणि (का-६), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, का-७.

**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत जिल्हा कक्ष**
**ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील मंजूर अस्थायी प**
**दि.१.१०.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेव**
**मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र.मबाआ-२०११/ प्र.क्र.७१/ का-७
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०११.

**वाचा** :-१) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५ एप्रिल,
२) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००३/प्र.क्र.४३८/का-६, दि.१४ जाने
३) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६, दि.३१ मा
४) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि.१६.१०.२
५) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००८/ प्र.क्र. २३०/का-६, दि. १६ जुल
६) केंद्र शासनाचे पत्र क्र.एफ-१४-९/२००५-सीडी-१, दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१० चे पत्र.
७) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००८/प्र.क्र.२३१/का-६, दि. १६.७.२०
८) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०११/प्र.क्र.७१/का-७, दि. ३०.४.२
९) आयुक्त, महिला व बाल विकास सेवा आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. मबाविआ/अ
एबाविसे/नाप्र/का-१/२०११/ ४२७९, दि.१३.१०.२०११ व दि.१८.१०.२०११.

**निर्णय** :- महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून सुधारित आ शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि.५.४.२००३ अन्व केलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेली पदे तसेच संदर्भाधीन महिला विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६, दि.३१ मार्च, २००६, महिला विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि. १६ ऑक्टोबर, २००७ व क्र. २००८/प्र.क्र.२३१/कस-६, दि.१६.७.२००९ अन्वये नव्याने निर्माण करण्यात आलेली अस्थायी पदे विचार तसेच केंद्र शासनाच्या दि.८.५.२००९ च्या पत्राने ३३ जिल्हा कक्षातील व शासन निर्णय महिला बाल विका दि. १४.१.२००४ अन्वये प्रकल्पातील निश्चित केलेल्या आकृतीबंधातील मंजूर पदांच्या मर्यादेत एकात्मि विकास सेवा योजनेतंर्गत ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी प अगंणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस आणि मिनी अंगणवाडी सेविका अशी एकूण १,७५,४८८ मान दि.१.३.२०११ ते ३०.९.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन निर्णय दि.३० एप्रिल २०११ अन्वये देण्यात आली होती.